**परभणी शहर महानगरपालिकेमध्ये मानधन तत्वावर कार्यरत असलेल्या कंत्राटी अभियंता/स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक यांचे महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र: पमपा-२०२०/प्र.क्र.८२/नवि-२४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- ३० सप्टेंबर, २०२१

वाचा:-१) परभणी महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र. १४७ दि. २५.७.२०१८
२) उप आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. कावि३/आस्था/७४/२०२० दि. ५.५.२०२०
३) आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. कावि३/आस्था/२०४/२०२० दि.४.९.२०२०
४) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र.नमुंम१२२१/प्र.क्र ७ /नवि-२८ दि. २७.७.२०२१

**प्रस्तावना:-**

सन २०११ च्या जनगणेनुसार परभणी शहराची लोकसंख्या ३ लाखापेक्षा जास्त असल्यामुळे परभणी नगर परिषदेचे परभणी शहर महानगरपालिकेत रुपांतरण झाले. परभणी शहर महानगरपालिकेतील विविध विकास कामे व योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी महानगरपालिकेस अधिकारी व कर्मचा-यांची आवश्यकता असल्याने तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांसाठी कंत्राटी तत्त्वावर/निश्चित मानधनावर कंत्राटी अभियंता भरतीसाठी वर्तमानपत्रात जाहिरात देऊन अर्ज मागविले होते. अर्ज प्राप्त करुन शैक्षणिक पात्रता तपासून पात्र उमेदवारांची मुलाखत घेऊन अभियंत्यांची महानगरपालिकेने तात्पुरती नियुक्ती केली.

२. परभणी शहर महानगरपालिका सर्वसाधारण सभेने सदर कंत्राटी अभियंते/कर्मचारी यांना परभणी शहर महानगरपालिकेतील आस्थापनेच्या आकृतीबंधातील रिक्त मंजूर पदांवर शासन नियमानुसार कार्यवाही करुन सामावून घेण्यास ठराव क्रमांक १४७ दि.२५.७.२०१८ रोजी मान्यता दिलेली आहे. सदर प्रकरणांतील अभियंताची नियुक्ती विहित मार्गाने झालेली असल्याने सर्वसाधारण सभेचा ठराव क्र. १४७ दि. २५.७.२०१८ नुसार त्यांना महानगरपालिकेतील रिक्त पदावर सामवून घेण्याची शिफ़ारस परभणी महानगरपालिकेने त्यांच्या संदर्भाधीन दिनांक ५.५.२०२० च्या पत्रान्वये केली आहे.

३. नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवर विहित प्रक्रिया पार पाडून करार पध्दतीने (कंत्राटी) तात्पुरत्या स्वरुपात वेतनश्रेणी, किमान वेतन व ठोक मानधनावर काम करणाऱ्या अधिकारी/कर्मचा-यांच्या नेमणूका ह्या विहित मार्गाचा (जाहिरात /लेखी परिक्षा/मुलाखत) अवलंब करून झालेल्या असल्याचे तसेच सदर कर्मचारी हे त्यांच्या पदासाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता व पात्रता धारण करीत असल्यामुळे सदर अधिकारी/ कर्मचाऱ्यांना महानगरपालिकेच्या आकृतीबंधातील मंजूर व रिक्त

पदावर नियमित समावेशन करण्यास शासन निर्णय दिनांक २७.७.२०२१ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

४. आयुक्त,परभणी शहर महानगरपालिकेकडुन प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयाप्रमाणे परभणी शहर महानगरपालिकेतील मानधन तत्वावर कार्यरत असलेल्या कंत्राटी अभियंता/स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक यांच्या नियुक्त्या ह्या विहित मार्गाचा (जाहिरात/लेखी परिक्षा/मुलाखत) अवलंब करून झालेल्या असल्याने तसेच सदर कर्मचारी हे त्यांच्या पदासाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता व पात्रता धारण करीत असल्यामुळे त्यांचे परभणी शहर महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर प्रस्तावासंदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

## शासन निर्णय :-

परभणी शहर महानगरपालिकेच्या संदर्भाधीन दिनांक ५.५.२०२० च्या प्रस्तावात नमूद केलेल्या मानधन/कंत्राटी तत्वावर विहित मार्गाचा अवलंब करून (जाहिरात/लेखी परिक्षा/ मुलाखत) नियुक्त झालेल्या खालील ४ संवर्गातील एकूण १६ अधिकारी/कर्मचा-यांना महानगरपालिकेच्या आकृतीबंधातील मंजुर व रिक्त पदावर नियमित समावेशन करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अनु.क्र | पदनाम | अधिकारी/कर्मचा-यांची संख्या |
|---|---|---|
| १. | उप अभियंता (स्थापत्य) | २ |
| २. | शाखा अभियंता (स्थापत्य / यांत्रिकी) | ५ |
| ३. | कनिष्ठ अभियंता (स्थापत्य/विद्युत/पाणीपुरवठा) | ७ |
| ४. | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक | २ |
| एकूण | | १६ |

२. उपरोक्त अधिका-यांचे परभणी शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील नियमित समावेशन पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहुन करण्यात येत आहे.

**अटी व शर्ती** :-

१) सदर अधिका-यांचे शासन निर्णयाच्या दिनांकापासून महानगरपालिकेच्या सेवेत समावेशन करण्यात यावे.

२) समावेशन झालेल्या अधिका-यांची नियमित सेवा सर्व प्रयोजनार्थ त्यांच्या समावेशनाच्या दिनांकापासून ग्राह्य धरण्यात यावी.

३) नियमित सेवेच्या दिनांकापासून त्यांना सेवा जेष्ठता, निवृत्ती वेतन इ.चे लाभ अनुज्ञेय राहतील.

४) समावेशनामुळे त्यांना पूर्वीच्या सेवाकालावधीतील वेतन, भत्ते व अन्य अनुषंगिक वित्तीय लाभ यांची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.

५) समावेशन करण्यापूर्वी संबंधित अधिका-यांकडून बंधपत्र घेवून त्यामध्ये मागील सेवाविषयक कोणताही लाभ मिळणार नाही. तसेच भविष्यात याबाबत मागणी करता येणार नाही. याचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

६) सदर अधिका-यांच्या नियमित समावेशनानंतर त्यांच्या वेतनाकरीता कोणताही निधी शासनाकडून उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

२. उक्त शासन निर्णयाप्रमाणे या प्रकरणी त्वरीत कार्यवाही करून अनुपालन अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा सांकेतांक क्र. २०२१०९३०१८२७२२९०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल्य यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2021.09.30 18:28:10 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
२. महापौर, परभणी शहर महानगरपालिका, परभणी
३. आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका, परभणी
४. मा. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक
५. उप आयुक्त (प्रशासन) परभणी शहर महानगरपालिका, परभणी
६. निवडनस्ती (नवि-२४).